**मौजे तडसर ता. कडेगांव, जि. सांगली येथील गट नं.१११८, ११५७, ११५८, ११६७ मधील २०.०० हे गायरान जमीन कृषी विज्ञान केंद्र स्थापन करण्यासाठी संचालक, विस्तार शिक्षण व प्रशिक्षण महाराष्ट्र पशू व मत्स्य विज्ञान विद्यापीठ, नागपूर यांना उपलब्ध करून देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.जमिन.३६१८/प्र. क्र.१०५/ज-५ अ**
मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मुंबई ०३२.
दि.२२/११/२०१८.

वाचा :- १) विभागीय आयुक्त, पुणे यांचा प्रस्ताव क्र. मह /२/ जमीन- सां/कावि/५७/ २०१८, दि.२३/०३/२०१८.
२) जिल्हाधिकारी, सांगली यांचे पत्र क्र.मह-२/ जमिन/अवेट-१९/२०१८, दि.१३/०३/२०१८.

**प्रस्तावना -:**

मौजे तडसर ता. कडेगांव ,जि. सांगली येथील मौजे तडसर, ता.कडेगांव येथील गट नं.१११८ क्षेत्र ६ हे.०६ आर, गट नं.११५७ क्षेत्र ४ हे.९७ आर, गट नं.११५८ क्षेत्र ७ हे ५१, व गट नं.११६७ क्षेत्र मधील १ हे.४६ आर अशी एकूण २० हे. क्षेत्र एवढी गायरान जमीन संचालक, विस्तार शिक्षण व प्रशिक्षण, विज्ञान पशु व मत्स्य विद्यापीठ यांना कृषी विज्ञान केंद्राची स्थापना या “ सार्वजनिक ” प्रयोजनार्थ प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

महाराष्ट्र शासन राजपत्र दिनांक २६ एप्रिल, २०१७ अन्वये महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ याच्या कलम २२ नंतर गायरान जमिनींचे वापरातील परिवर्तनाबाबत कलम २२ अ समाविष्ट करणेत आले आहे. या राजपत्रातील कलम २२ अ मधील (२) नुसार केंद्र सरकार किंवा राज्य सरकार किंवा केंद्र सरकारच्या किंवा राज्य सरकारच्या नियंत्रणाखालील कोणतेही वैधानिक प्राधिकरण किंवा कोणतेही सार्वजनिक प्राधिकरण किंवा उपक्रम यांच्या एखाद्या सार्वजनिक प्रयोजनासाठी किंवा सार्वजनिक प्रकल्पासाठी जर इतर कोणताही योग्य शासकीय भूखंड उपलब्ध नसेल तर, ती गायरान जमीन अशा सार्वजनिक प्रयोजनासाठी किंवा सार्वजनिक प्रकल्पांसाठी परिवर्तीत करता येईल किंवा पट्ट्याने देता येईल अशी तरतूद आहे. तसेच याच राजपत्रातील पोट कलम ६ अन्वये गायरान जमीनीचे कोणतेही वापरातील परिवर्तन, प्रदान किंवा पट्टयाने प्रदान हे राज्य शासनाव्यतिरिक्त इतर कोणत्याही प्राधिकाऱ्याकडून केले जाणार नसल्याबाबतची तरतूद आहे. त्यानुसार राज्य शासनासप्राप्त अधिकारांनुसार वित्त विभागाच्या सहमतीने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

मौजे तडसर ता. कडेगांव, जि. सांगली येथील मौजे तडसर, ता.कडेगांव येथील गट नं.१११८ क्षेत्र ६ हे.०६ आर, गट नं.११५७ क्षेत्र ४ हे.९७ आर, गट नं.११५८ क्षेत्र ७ हे ५१, व गट नं.११६७ क्षेत्र ७.८६ हे. आर मधील १ हे.४६ आर अशी एकूण २० हे. क्षेत्र एवढी गायरान जमीन महसूलमुक्त, भोगवटारहित व कब्जेहक्काने कृषी विज्ञान केंद्र स्थापन करण्यासाठी संचालक, विस्तार शिक्षण व प्रशिक्षण, महाराष्ट्र पशु व मत्स्य विद्यापीठ यांना सार्वजनिक प्रयोजनार्थ प्रदान करण्यास शासन मान्यता देत आहे.

प्रस्तुत शासन मान्यतेस अनुसरून जिल्हाधिकारी, सांगली यांनी त्यांना आवश्यक वाटतील अशा उचित अटी व शर्तींवर मंजूर जमिन संस्थेस प्रदान करण्याबाबतची कार्यवाही करावी.

२. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.अनौसंक्र-३२४/व्यय-९/२०१८, दि. २९/०८/२०१८ अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे .

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यात आला आहे. त्याचा सांकेतांक क्र. २०१८११२२१११७३१११११९ असा असून डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

K. P. Wadte

Digitally signed by K. P. Wadte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=092f3d18dd73e55dfcdc33acd72708a0290e9758bc4e1500205b182e2d843c82, cn=K. P. Wadte
Date: 2018.11.22 11:24:22 +05'30'

**( कि. पां. वडते)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे स्वीय सचिव, मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई
२) मा. मंत्री (महसूल) यांचे स्वीय सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे स्वीय सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. विरोधी पक्ष नेता, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
५) मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा, विधानभवन, मुंबई.
६) विभागीय आयुक्त, पुणे.
७) जिल्हाधिकारी, सांगली.
८) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सांगली.
९) वित्त विभाग (व्यय-९), मंत्रालय, मुंबई
१०) ग्राम विकास विभाग (पंरा-५), मंत्रालय, मुंबई
११) विधी व न्याय विभाग (ए-ब्रँच), मंत्रालय, मुंबई.
१२) निवडनस्ती, कार्यासन ज-५ अ, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.

***